**पर्यटन धोरण -२०१६**
**राज्याच्या पर्यटन**
**धोरणानुसार पर्यटन**
**स्थळ म्हणून घोषित**
**घटकांची पाणीपट्टी**
**आकारणीबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
**शासन परिपत्रक क्रमांकः ग्रापापु-१११६/प्र.क्र.१२० /पापु-०७**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २१ डिसेंबर, २०१६

**वाचा :**

१) **शासन परिपत्रक क्रमांकः** पा.पु.व स्व.विभाग,शासन परिपत्रक क्र.ग्रापापु-१००७ /प्र.क्र.१७५ /पापु-०७ दिनांक ७.११.२००७
२) **शासन निर्णय क्रमांकः** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टीडीएस-२०१५/११ प्र.क्र.१०२१ / पर्यटन, दि. ४ मे, २०१६

## शासन परिपत्रक:

राज्यातील पर्यटन व्यवसायाचा विकास करण्याच्या दृष्टिकोनातून शासनाने दिनांक ४ मे, २०१६ च्या शासन निर्णयान्वये राज्याचे पर्यटन धोरण-२०१६ घोषित केले आहे. या धोरणाच्या अनुषंगाने संबंधित प्रदेशातील पाणी पुरवठा योजनांच्या पाणीपट्टीच्या आकारणी संदर्भात क्षेत्रीय अधिका-यांना सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या संदर्भीय दि. ४ मे, २०१६ च्या शासन निर्णयानुसार पर्यटन स्थळ म्हणून घोषित केलेल्या प्रदेशातील पात्र घटकांना विविध करांमधून सूट घोषित करण्यात आली आहे. तर, पिण्याच्या पाणी पुरवठया संदर्भात पाणीपट्टीची आकारणी जास्तीत जास्त औद्यागिक दराने करण्यात येईल. तसेच सिंधुदुर्ग, औरंगाबाद आणि नागपूर जिल्हयातील व अन्य क्षेत्रांसाठी पर्यटन क्षेत्रे म्हणून घोषित केलेल्या विशेष कार्यक्रमांतर्गत पाणीपट्टी व विद्युत शुल्क यामध्ये १० वर्षे कोणतीही वाढ होणार नाही. तथापि, अशा सेवांच्या कार्यान्विततेच्या खर्चात कोणतीही प्रत्यक्ष वाढ झाल्यास उपयोगकर्त्यांकडून पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार वसूली करण्यात येईल, असे स्पष्ट करण्यात आले आहे.

३. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी शासनाने मागणी आधारित समूह सहभागाच्या पुरोगामी धोरणाचा स्विकार केलेला आहे. त्यानुसार ग्रामीण भागातील पाणी पुरवठा योजनांची मागणी, आखणी, अंमलबजावणी व देखभाल दुरुस्ती या सर्व बाबींची जबाबदारी प्रादेशिक योजनांच्या बाबतीत जिल्हा स्तरावर जलव्यवस्थापन व स्वच्छता समिती व ग्रामस्तरावर ग्राम आरोग्य, पोषण, पाणी पुरवठा व स्वच्छता समितीकडे सोपविण्यात आली आहे. त्यानुसार पाणी पुरवठा योजना सुरवातीला कार्यान्वित होण्यासाठी योग्य ती पाणी पट्टी आकारणे, तीत वाढ करणे ही बाब संबंधित समित्यांच्या अखत्यारीत आहेत. शासनाने पाणीपट्टीचे किमान दर निश्चित केलेले आहेत, मात्र पाणीपट्टीत वाढ करण्याची कोणतीही मर्यादा घातलेली नाही.

४. या अनुषंगाने पर्यटन स्थळ म्हणून घोषित केलेल्या प्रदेशातील पर्यटन धोरणानुसार पात्र ठरलेल्या घटकांसाठी पाणीपट्टीची आकारणी करताना ती औद्योगिक दरापेक्षा जास्त नसावी. तसेच सिंधुदुर्ग, औरंगाबाद, नागपूर जिल्हा व अन्य क्षेत्रांसाठी पर्यटन क्षेत्रे म्हणून घोषित केलेल्या विशेष कार्यक्रमांतर्गत प्रदेशांसाठी पाणीपट्टीच्या दरात पुढील १० वर्षे वाढ करण्यात येऊ नये. मात्र, शासन धोरणाच्या अधिन राहून योजनेच्या कार्यान्वयन खर्चात झालेल्या प्रत्यक्ष वाढीच्या अनुषंगाने पाणी पट्टीच्या दरात वाढ करण्यात यावी.

५. पर्यटन धोरणाच्या अनुषंगाने पात्र घटकांना प्राथम्याने नळ जोडणी करुन देणे, किमान परिस्थितीत पाणी पुरवठा सुरळीत राहील याची काळजी घेणे, याकडे संबंधित क्षेत्रीय अधिका-यांनी विशेष लक्ष द्यावे.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२२१०३५०२२०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yashwant Tedgya Padvi

Digitally signed by Yashwant Tedgya Padvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42f023d235c1f55c387492762e66530fd58085d2893f88445cf00fc7709a8080, serialNumber=c96ec3b84dfb89ca1fbee688d0dbc9e15c61e7e091602f1cc5c94657fc4d9c86, cn=Yashwant Tedgya Padvi
Date: 2016.12.22 15:48:13 +05'30'

**य.टे.पाडवी**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय, मुंबई.
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ लि.,मुंबई.

५. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
९. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१०.प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा (सर्व)
११.जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा (सर्व)
१२.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१३.तहसीलदार (सर्व)
१४.गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
१५.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
१६.निवडनस्ती पापु-०७